आश्रमशाळांच्या सोयी-सुविधांसाठी क्षेत्रीय अधिका-यांची समन्वय समिती गठीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : शाआशा २०१६/ प्र.क्र. ४४६/ का.१३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय मुंबई - ४०००३२
दिनांक : २७ डिसेंबर २०१६

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागांतर्गतच्या शासकीय व अनुदानित आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांचे सर्पदंश, आजारपण, अपघात , पाण्यात बुडून, आकस्मिक व इतर अन्य इतर कारणाने मोठया प्रमाणावर मृत्यू झालेले आहेत. यासंदर्भात संसद व विधानमंडळामध्ये वेळोवेळी विविध माध्यमातून चर्चा उपस्थित करण्यात येतात. तसेच वर्तमानपत्र व टि.व्ही.वरही यासंदर्भात बातम्या प्रसिध्द होतात. श्री.रविंद्र तळपे यांनी शासकीय तसेच अनुदानित आश्रमशाळांमध्ये विद्यार्थ्यांच्या होणा-या मृत्युंच्यासंदर्भात मा.उच्च न्यायालय. मुंबई येथे जनहीत याचिका दाखल केलेली आहे. सदर जनहीत याचिका क्र.६९/२०१३ वर मा. उच्च न्यायालयाने दि.१८.०६.२०१३ रोजी दिलेल्या निर्देशास अनुसरून आश्रमशाळांमध्ये निवासी सुविधा व इतर मुलभूत सुविधा पुरविण्याचे निर्देश दिले आहेत. शासकीय आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांचे मृत्यूंच्या कारणांचा अभ्यास करून ते रोखण्यासाठी करावयाच्या उपाययोजनांबाबत मार्गदर्शन करण्यासाठी डॉ. सुभाष साळुंखे यांचे अध्यक्षतेखाली तांत्रिक समिती स्थापन करण्यात आली होती. सदर समितीने दि.१७.१०.२०१६ रोजी आपला अहवाल मा. राज्यपाल महोदयांकडे सादर केलेला आहे. सदर अहवालात त्यांनी आश्रमशाळांना आवश्यक सोयीसुविधा विहित वेळेत व तातडीने उपलब्ध होण्यासाठी सार्वजनिक आरोग्य, महिला व बालविकास , ग्राम विकास, पाणी पुरवठा स्वच्छता , सार्वजनिक बांधकाम , शिक्षण, अन्न व नागरी पुरवठा या विभागातील अधिका-यांची समन्वय समिती स्थापन करण्याबाबत शिफारस केलेली आहे. सदर शिफारशीस अनुसरून समन्वय समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांच्या मृत्यूसंदर्भात कारणांचा अभ्यास करुन उपाययोजना सुचविण्यासाठी शासनाने गठीत केलेल्या डॉ. सुभाष साळुंखे समितीने सादर केलेल्या अहवालमधील शिफारशींस अनुसरून आश्रमशाळांना आवश्यक सोयीसुविधा विहित वेळेत व तातडीने उपलब्ध होण्यासाठी सार्वजनिक आरोग्य, महिला व बालविकास, ग्राम विकास, पाणी पुरवठा स्वच्छता, बांधकाम विभाग, शिक्षण, अन्न व नागरी पुरवठा या विभागातील अधिका-यांची समन्वय समिती गठीत करण्यात येत आहे.

२. जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समन्वय समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद | सहअध्यक्ष |
| ३. | जिल्हा पोलीस अधिक्षक (ग्रामीण) | सदस्य |
| ४. | कार्यकारी अभियंता, आदिवासी विकास विभाग बांधकाम कक्ष | सदस्य |
| ५. | कार्यकारी अभियंता,पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग | सदस्य |
| ६. | कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जिवन प्राधिकरण | सदस्य |
| ७. | जिल्हा शल्य चिकित्सक | सदस्य |
| ८ | उप मुख्य कार्यकारी अधिकारी, महिला व बालविकास, | सदस्य |
| ९. | जिल्हा आरोग्य अधिकारी | सदस्य |
| १०. | जिल्हा हिवताप अधिकारी | सदस्य |
| ११. | जिल्हा शिक्षणाधिकारी (माध्यमिक) | सदस्य |
| १२. | जिल्हा शिक्षणाधिकारी (प्राथमिक ) | सदस्य |
| १३. | प्रकल्प अधिकारी,ए.आ.वि.प्र. | सदस्य सचिव |

३. जिल्हास्तरीय समन्वय समितीची कार्ये खालीलप्रमाणे असतील.

१) जिल्हास्तरीय समितीने प्रत्येक तिमाहीस जिल्हयातील शासकीय आश्रमशाळांमधील सेवा सुविधा बाबत आढावा घेवून सदर शाळांमध्ये पायाभूत सुविधा, आरोग्य विषयक सुविधा,पोषण, स्वच्छ पाणीपुरवठा,सुरक्षेच्या दृष्टीने शाळेमधील पोषक वातावरण, शैक्षणिक दर्जा इ.संदर्भात करावयाच्या उपाययोजनांचा कालबध्द आराखडा तयार करावा.

२) सदरचा आराखडा तयार करताना प्रकल्प स्तरावरील समितीने केलेल्या शिफारशी व त्या बैठकीतील निर्णय याचा विचार करण्यात यावा.

३) वरील आराखडयास अनुसरुन कामाशी संबंधित क्षेत्रिय यंत्रणांनी करावयाची अंमलबजावणी व त्याचा कालावधी याबाबत संबंधित यंत्रणांना निर्देश द्यावेत.

४) समितीने सदर आराखडयाची अंमलबजावणी संबंधित क्षेत्रिय यंत्रणांकडून विहीत वेळेत होते किंवा नाही याचा आढावा प्रत्येक तिमाहीस घेण्यात यावा.

५) क्षेत्रीय यंत्रणांकडून आश्रमशाळांना सोयी सुविधा पुरविण्यामध्ये हलगर्जीपणा होत असल्यास व त्यामुळे आश्रमशाळेमध्ये सोयीसुविधा मिळण्यास अडचण होऊन काही समस्या निर्माण झाल्यास सदर बाब समितीने त्यांचे वरीष्ठ अधिका-याच्या व संबंधित प्रशासकीय विभागाच्या निदर्शनास आणून द्यावी.

४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांच्या अध्यक्षतेखालील प्रकल्प स्तरीय समन्वय समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.-

| | | |
|---|---|---|
| १. | प्रकल्प अधिकारी,ए.आ.वि.प्रकल्प | अध्यक्ष |
| २. | तहसीलदार | सदस्य |
| ३. | प्रकल्प कार्यालयाच्या मुख्यालयी असलेले उपविभागीय पोलीस अधिकारी ( प्रकल्प कार्यालयाच्या मुख्यालयी असलेले वा लगतचे ) | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ४. | प्रकल्प कार्यालयाच्या मुख्यालयी असलेले कार्यकारी अभियंता (सा.बां.आ.वि.वि.) | सदस्य |
| ५. | प्रकल्प कार्यालयाच्या मुख्यालयी असलेले कार्यकारी अभियंता (सा.बां.विद्युत) | सदस्य |
| ६. | प्रकल्प कार्यालयाच्या मुख्यालयी असलेले जिल्हा हिवताप अधिकारी | सदस्य |
| ७. | प्रकल्प कार्यालयाच्या मुख्यालयी असलेले गटशिक्षणाधिकारी | सदस्य |
| ८. | कनिष्ठ शिक्षण विस्तार अधिकारी | सदस्य |
| ९. | सहाय्यक प्रकल्प अधिकारी(शिक्षण) | सदस्य सचिव |

५. प्रकल्प स्तरीय समन्वय समितीची कार्ये खालीलप्रमाणे असतील.

१) प्रकल्प स्तरीय समितीने प्रत्येक महिन्यास जिल्हयातील आश्रम शाळांमधील सेवा सुविधा बाबत आढावा घेवून सदर शाळांमध्ये पायाभूत सुविधा, आरोग्य विषय सुविधा,पोषण, स्वच्छ पाणीपुरवठा,सुरक्षेच्या दृष्टीने शाळेमधील पोषक वातावरण, शैक्षणिक दर्जा इ.संदर्भात करावयाच्या उपाययोजनांचा कालबध्द आराखडा तयार करावा.

२) वरील आराखडयास अनुसरुन कामाशी संबंधित क्षेत्रिय यंत्रणांनी करावयाची अंमलबजावणी व त्याचा कालावधी याबाबत संबंधित यंत्रणांना निर्देश द्यावेत.

३) समितीने सदर आराखडयाची अंमलबजावणी संबंधित क्षेत्रिय यंत्रणांकडून विहीत वेळेत होते किंवा नाही याचा आढावा प्रत्येक महिन्यास घेण्यात यावा.

४) क्षेत्रीय यंत्रणांकडून आश्रमशाळांना सोयी सुविधा पुरविण्यामध्ये हलगर्जीपणा होत असल्यास व त्यामुळे आश्रमशाळेमध्ये सोयीसुविधा मिळण्यास अडचण होऊन काही समस्या निर्माण झाल्यास सदर बाब समितीने जिल्हास्तरीय समितीच्या बैठकीत निदर्शनास आणून द्यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२८१५५५१७२४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2016.12.28 15:58:36 +05'30'

**(सु.ना. शिंदे )**

उप सचिव, आदिवासी विकास विभाग

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२
३. मा.मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२
४. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

६. मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. मा. मंत्री, पाणीपुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. मा. मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. मा. मंत्री, अन्न व नागरी पुरवठा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. मा.मंत्री, ग्रामविकास व जलसंधारण विभाग
११. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबईः- ४०० ०३२
१२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबईः- ४०० ०३२
१३. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबईः- ४०० ०३२
१४. प्रधान सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबईः- ४०० ०३२
१५. प्रधान सचिव, अन्न व नागरी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबईः- ४०० ०३२
१६. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबईः- ४०० ०३२.
१७. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबईः- ४०० ०३२.
१८. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबईः- ०३२.
१९. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबईः- ४०० ०३२
२०. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२२. आयुक्त, बाल कल्याण, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन ,नवि मुंबई.
२३. अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / अमरावती / नागपूर.
२४. सर्व जिल्हाधिकारी
२५. सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक
२६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२७. सर्व कार्यकारी अभियंता,पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग
२८. सर्व कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जिवन प्राधिकरण
२९. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक
३०. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी
३१. सर्व जिल्हा हिवताप अधिकारी
३२. सर्व जिल्हा शिक्षणाधिकारी (माध्यमिक(
३३. सर्व जिल्हा शिक्षणाधिकारी (प्राथमिक )
३४. सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( महिला व बाल विकास ), जिल्हा परिषद.
३५. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
३६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
३७. महालेखापाल (लेखा परिक्षा), / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मंबई .
३८. महालेखापाल (लेखा परिक्षा), / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- २, नागपूर.
३९. सर्व सह सचिव / उप सचिव/अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४०. निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.